चांदूरबाजार पं.स.(अमरावती) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
# शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१३प्र.क्र.१९२/पंरा-७

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २६ ऑगस्ट,२०१४

**वाचा :-**

१) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,अमरावती यांचे पत्र क्र.जिप/बांध/तां.४/४४७६/२०१३, दिनांक २०.५.२०१३ व दिनांक ३०.७.२०१३**

**प्रस्तावना :-**

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., अमरावती यांनी वरील पत्रान्वये चांदूरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. चांदूरबाजार पंचायत समिती कार्यालयाची मौजे प्रल्हादपूर, न.भू.क्र.३ उपविभाग-१ अ येथील अस्तित्वातील इमारत ही सन १९५९-६० मध्ये लोड बेअरींग पध्दतीत बांधण्यात आली आहे. सदरहू कार्यालयीन इमारतीचे एकूण जोता क्षेत्रफळ १४५.७२ चौ.मी. आहे. सदर इमारतीचे बांधकाम मोडकळीस आलेले असून, सद्य:स्थितीत सदरहू इमारत पंचायत समितीच्या सर्व कार्यालयांना कामकाजासाठी अपुरी पडत आहे. त्यामुळे अस्तित्वातील मोडकळीस आलेल्या इमारतीचे बांधकाम पाडून, त्या ठिकाणी पंचायत समितीकरीता नविन प्रशासकीय इमारत बांधण्याबाबत पंचायत समितीने दिनांक १२.४.२०१२ रोजी ठराव मंजूर केला आहे. त्यानुसार मु.का.अ., जि.प., अमरावती यांनी मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.मंडळ, मुंबई यांच्याकडील टाईप प्लॅन जॉब नं.एएमव्ही/१४०७, नकाशा क्र.०१ या नमुना नकाशावर आधारीत प्रस्ताव सादर केला आहे. सदर आराखड्यानुसार नवीन पंचायत समितीच्या इमारत बांधकामासाठी एकुण १३३३.६७ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. या साठी रु. ६००.३१ लक्ष इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २०१२-१३ च्या दरसुचीवर अधारीत असून, ते उप अभियंता, उपविभाग-अमरावती व कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., अमरावती यांनी साक्षांकित केले आहे. मु.का.अ., जि.प.,अमरावती यांनी प्रस्तावासोबत कामाचे सविस्तर अंदाजपत्रक, नमुना नकाशा, साईट प्लॅन, जागा मालकीचा

उतारा, जुन्या इमारतीचे फोटो, अस्तित्वातील इमारत जीर्ण झाल्याबाबत स्ट्रक्चरल ऑडिट रिपोर्ट व प्रमाणपत्र, पं.स.ठरावाची प्रत इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., अमरावती यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननीअंती चांदूरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रु. ३९३.१६ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

४. चांदूरबाजार (जि.अमरावती) प्रल्हादपूर येथील न.भू.क्र.३, उपविभाग-१अ मधील मोडकळीस आलेले इमारत बांधकाम पाडून, त्या ठिकाणी चांदूरबाजार पं.स.च्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रुपये- ३,९३,१६,०००/- (रुपये तीन कोटी त्र्यानव लक्ष सोळा हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) नियोजित चांदूरबाजार पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.मं.मुंबई यांच्याकडील विहीत नमुना आराखड्यानुसार हाती घेताना स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठीच्या प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाची दर्शविण्यात आलेली जागा बदलण्यात येवून, सदरील व्यवस्था पदाधिकारी यांच्या दालना लगत निर्माण करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

५) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

७) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

६. चांदूरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENERAL ABSTRACT FOR CHANDURBAZAR P.S., ADMIN., BLDG. | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of item** | **Amount (in Rs.)** |
| **1** | **Building Civil Work Portion** | **30244646.00** |
| **2** | **Add 11% for Electrification** | **3326911.06** |
| **3** | **Add 8% for Water Supply & Sanitation** | **2419571.68** |
| **4** | **Add for Rain Water Harvesting & Fire Fighting** | **300000.00** |
| **5** | **Add 4% for Contingencies** | **1209785.84** |
| **6** | **Add 6% Price Escalation** | **1814678.76** |
| | **Grand Total** | **39315593.34** |
| | **Say** | **Rs.3,93,16,000/-** |

७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडुन त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१२३६५७२२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Wade Chandrakant Haridas

Digitally signed by Wade Chandrakant Haridas
DN: CN = Wade Chandrakant Haridas, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.10 11:07:00 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त अमरावती विभाग, नवी मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद अमरावती
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा अमरावती
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अमरावती
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा अमरावती विभाग, नवी मुंबई
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अमरावती
१२) सभापती, पंचायत समिती, चांदूरबाजार, जिल्हा अमरावती
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चांदूरबाजार, जिल्हा अमरावती
१४) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई